अहमदनगर जिल्हा कारागृह येथील इमारतीची दुरुस्ती तसेच किरकोळ बांधकाम करण्यासाठी येणा-या खर्चास व अंदाजपत्रके व नकाशास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : बीएलडी २००५/प्र.क्र.१०५/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : ३१ ऑगस्ट, २००५.

वाचा :-कारागृह महानिरीक्षणालयाचे पत्र क्र.बीएलडी/१२७८/४९०/११९०४/कक्ष-३, दि.१६.१.२००३ व दि.१६.६.२००५.

**शासन निर्णय** :-अहमदनगर जिल्हा कारागृह येथील इमारतीची तसेच सर्व बरॅक्स व निवासस्थानांची दुरुस्ती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात असे नमूद करण्यात येते की, अहमदनगर जिल्हा कारागृह हे सुमारे ११४ वर्षापूर्वीचे असल्याने त्याची आयुष्यमर्यादा वाढविण्याच्या दृष्टीने तेथील इमारतीची तसेच बरॅक्स व निवासस्थांनाची दुरुस्ती करणे आवश्यक आहे. त्यासाठी सदर बांधकामाचा समावेश केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजना (७५:२५) च्या सुधारीत आराखडयात केला असून त्याकरीता रु.२५.०८ लाख इतक्या रकमेची तरतूद आराखडयात केली आहे.

२. अहमदनगर जिल्हा कारागृह येथे खालील प्रमाणे बांधकामे करणे अत्यंत आवश्यक आहेत:-

| | | |
|---|---|---|
| अ) | सर्व बरॅकींची दुरुस्ती करणे | रु.५,०८,१०६/- |
| ब) | कारागृहाची इमारत व कार्यालय दुरुस्ती करणे | रु.५,७३,७३२/- |
| क) | कर्मचारी निवासस्थानांची दुरुस्ती करणे | रु.४,११,६३९/- |
| ड) | स्त्री बंदी बरॅकींची दुरुस्ती करणे | रु.५,७४,६३२/- |
| इ) | अधीक्षकांच्या निवासस्थानांची दुरुस्ती | रु.४,३८,९५९/- |
| | एकूण | रु.२५,०७,०६८/- |

उपरोक्त तपशिलाप्रमाणे बांधकामास एकूण येणारा खर्च रु.२५,०७,०६८/- इतका असल्याने सदर खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशे प्रशासकीय मान्यतेसाठी उक्त संदर्भाधिन पत्रान्वये कारागृह महानिरीक्षणालयाने सादर केले आहेत.

३. उपरोक्त वस्तुस्थितीत कारागृहाची सुरक्षितता कारागृहातील अधिका-यांच्या व कर्मचा-यांच्या सोयी सुविधेत होणारी वाढ, कामाची तातडी व केंद्र शासनाकडून यासाठी मिळणारा निधी विहीत वेळेत खर्च होणे या बाबी लक्षात घेता शासन या शासन निर्णयाद्वारे उक्त परिच्छेद-२ मध्ये नमूद केलेल्या अहमदनगर जिल्हा कारागृह येथील इमारतीच्या दुरुस्ती तसेच बरॅक्स व निवासस्थानांची दुरुस्तीसाठी येणारा खर्च रु.२५,०७,०६८/- (रुपये पंचवीस लाख सात हजार अडसष्ट फक्त) इतक्या खर्चास व अंदाजपत्रके आणि नकाशास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.बी-५, मुख्य लेखाशिर्ष "२०५६-तुरुंग, १०१-तुरुंग, केंद्र पुरस्कृत योजना (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (२०५६-०१८९) योजनेतर/दत्तमत" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै, २००१ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग पाचच्या परिशिष्ठातील अनु.क्र.१ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

आ.ग.परदेशी

( आ. ग. परदेशी )

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रत,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे.
अधिक्षक, अहमदनगर जिल्हा कारागृह, अहमदनगर.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर.
उप सचिव, इमारती-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
अवर सचिव, बीयुडी-१,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
श्री.बी.आर.कांबळे, उप अभियंता, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
निवड नस्ती,पीआरएस-२,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२

****